अमरावती जिल्हयातील वरुड तालुक्यातील पूर पुनर्वसित २६ गांवामध्ये नाली बांधकाम या नागरी सुविधा कामांच्या प्रशा. मान्यता प्राप्त कामांना कार्यारंभ आदेशाकरीता निधी मंजूरी बाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक एलएफडी २०२०/प्र.क्र.२९/र-१२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक - २९ मार्च, २०२३

वाचा-

१) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र. जीटीएल/एफएलडी-१०९१/प्र.क्र.१३२६/२-१२, दि.२१/०४/१९९२.
२) वित्त विभाग शासन निर्णय क्रः विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/०४/२०१५
३) वित्त विभाग शासन निर्णय क्रः विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६
४) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र. उपआ/पुनर्व/भूसं-१/मस/कावि-२२०/२०२२, दि.१७/११/२०२२
५) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक एलएफडी २०२०/प्र.क्र.२९/र-१२, दि.२८/०२/२०२३

**शासन निर्णय**

सन जुलै १९९१ मध्ये झालेली अतिवृष्टी व वर्धा नदीला आलेला महापूर यामुळे बाधित झालेल्या पुरग्रस्तांचे पुनर्वसन करण्याकरिता बाधित झालेल्या कुटूंबाचे पुनर्वसन करण्यासाठी शासनाने दि.२१/४/१९९२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानूसार विभागीय आयुक्त, अमरावती यांनी संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या पुनर्वसित २६ गांवामध्ये नाली बांधकाम या नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकास दि.२८/०२/२०२३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. प्रशासकीय मान्यता प्रदान नागरी सुविधा कामांच्या तसेच प्रकल्पयंत्रणेने सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने निविदा प्रक्रिया पुर्ण करुन कार्यारंभ आदेशान्वये काम सुरु करण्यासाठी शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, अमरावती जिल्हयातील वरुड तालुक्यातील खालील नमूद पूर पुनर्वसित २६ गांवामध्ये खालीलप्रमाणे नमूद केलेल्या नागरी सुविधेच्या कामाच्या निविदा प्रक्रिया पुर्ण करुन कार्यारंभ आदेशान्वये सन २०२२ २०२३ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु.३,९५,७२,०००/- (रुपये तीन कोटी पंच्यान्नव लक्ष बाहत्तर हजार फक्त) एवढा निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांना "मागणी क्रमांक सी-६, २२४५- नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०२- पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (०४) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ ०९८८) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, अमरावती यांच्यामार्फत संबंधित कार्यन्वयन यंत्रणा कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, अमरावती यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ क्र. | गावाचे नाव | नागरी सुविधा | प्रशा. मान्यता रक्कम | वितरणासाठी निधी |
|---|---|---|---|---|
| १ | आमनेर | सी सी नाली बांधकाम | ९०,५७,२८४/- | १५,३९,७३८/- |
| २ | देऊतवाडा | सी सी नाली बांधकाम | ९०,४१,८२०/- | १५,३७,१०९/- |
| ३ | वघाळ | सी सी नाली बांधकाम | १,०६,५७,२७९/- | १८,११,७३७/- |
| ४ | पोरगव्हाण | सी सी नाली बांधकाम | ४५,९०,९०१/- | ७,८०,४५३/- |
| ५ | मोशी खुर्द | सी सी नाली बांधकाम | ७१,०५,४९०/- | १२,०७,९३३/- |
| ६ | वेढापूर | सी सी नाली बांधकाम | २४,१९,०२८/- | ४,११,२३५/- |
| ७ | उदापुर | सी सी नाली बांधकाम | ४०,४८,८२३/- | ६,८८,३००/- |
| ८ | घोराड | सी सी नाली बांधकाम | २१,११,१८७/- | ३,५८,९०२/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ९ | चिंचरगव्हाण | सी सी नाली बांधकाम | ५३,१२,२८०/- | ९,०३,०८८/- |
| १० | मोरचुंद | सी सी नाली बांधकाम | २३,३७,४७५/- | ३,९७,३७१/- |
| ११ | वाडेगाव | सी सी नाली बांधकाम | ४६,६०,९९६ /- | ७,९२,३६९/- |
| १२ | गाडेगाव | सी सी नाली बांधकाम | ८४,००,०४८/- | १४,२८,००८/- |
| १३ | वाठोड | सी सी नाली बांधकाम | ५८,०२,१८२/- | ९,८६,३७१/- |
| १४ | खानापूर | सी सी नाली बांधकाम | ८,४९,५७०/- | १,४४,४२७/- |
| १५ | कुरळी | सी सी नाली बांधकाम | ६६,९२,३१५/- | ११,३७,६९४/- |
| १६ | पवनी | सी सी नाली बांधकाम | ७,९३,६९० /- | १,३४,९२७/- |
| १७ | सावंगी | सी सी नाली बांधकाम | १,९८,३२,४०६/- | ३३,७१,५०७/- |
| १८ | वंडली | सी सी नाली बांधकाम | ८३,३४,८५०/- | १४,१६,९२५/- |
| १९ | चांदस | सी सी नाली बांधकाम | १८,१९,५६५/- | ३,०९,३२६/- |
| २० | लिंगा | सी सी नाली बांधकाम | १,८९,३९,७७४/- | ३२,१९,७६२/- |
| २१ | सुरळी | सी सी नाली बांधकाम | ९७,८२,०४३/- | १६,६२,९४७/- |
| २२ | मालखेड | सी सी नाली बांधकाम | ५३,६६,००२/- | ९,१२,२२०/- |
| २३ | अमडापूर | सी सी नाली बांधकाम | ६८,८४,८६१/- | ११,७०,४२६/- |
| २४ | पुसला | सी सी नाली बांधकाम | ३,१८,३८,७२१/- | ५४,१०,५८३/- |
| २५ | शहापूर | सी सी नाली बांधकाम | २,६७,९५,८७३/- | ४५,५५,२९८/- |
| २६ | गणेशपूर | सी सी नाली बांधकाम | १,९३,१०,९८३/- | ३२,८२,८६७/- |
| | | **एकूण** | **२३,२७,८५,४४६/-** | **३,९५,७१,५२६/-** |

**अटी व शर्ती**

१) विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित कार्यन्वयन यंत्रणेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांच्या निविदा प्रक्रियेच्या कार्यारंभ आदेशान्वये कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, अमरावती व जिल्हाधिकारी, अमरावती यांना सत्वर सादर करावा.

३) या आदेशान्वये ज्या नागरी सुविधा कामांवर मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी त्याच मंजूर नागरी सुविधा कामावर खर्च करण्यात यावा. सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही, तसेच मंजूर निधी शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय अन्य कार्मावर खर्च होणार नाही याची संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

४) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्षातर्गत प्राप्त झालेला कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

५) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्षातर्गत संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत,

६) या संदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

७) संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certificate महालेखापाल कार्यालयास, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त व शासनास तातडीने सादर करावीत.

८) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२२-२०२३ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

२. वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी वरील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

३. सदर निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांना BEAMS प्रणालीवर तातडीने उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही महसूल व वन विभागाच्या म-११ कार्यासनाने करावी,

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२९१००३५५८६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHULARAM R NIKHARE

Digitally signed by CHULARAM R NIKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffbadf353be3592552a31, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E37123E923CF43F99F06B54384FF491E5F703F14D653B5A59D47EAB1F73E2597, cn=CHULARAM R NIKHARE
Date: 2023.03.31 12:41:19 +05'30'

**(चु. रा. निखारे)**
**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रत**

१. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
२. जिल्हाधिकारी, अमरावती
३. महालेखपाल (लेखा व अनुज्ञयेता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१ / नागपूर-२
४. महालेखपाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१ / नागपूर-२
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, जिल्हा परिषद, अमरावती
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
८. वित्त विभाग, कार्यासन व्यय-९, अर्थ संकल्प -६, मंत्रालय, मुंबई
९. महसूल व वन विभाग, कार्यासन म-११ / ब -१ / पी ए सी, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती र-१२.

---------